पदोन्नती

पदविकाधारक कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) संवर्गातून महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा गट-अ मधील उप विभागीय अधिकारी (स्थापत्य) पदावर पदोन्नती व पदस्थापना.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

## शासन आदेश क्रमांकः पीओजी-२०१६/प्र.क्र.३०८/सेवा-२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १.३.२०१७

## शासन आदेश

सन २०१५-२०१६ च्या पूरक निवडसूचीतील खालील तक्त्यामध्ये नमूद केलेल्या पदविकाधारक कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) (वेतनश्रेणी रु. ९३००-३४८०० + ग्रेड पे ४४००) यांना, पदविकाधारक कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) संवर्गातून महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा गट-अ मधील उप विभागीय अधिकारी ( वेतनश्रेणी रु.१५६०० - ३९१०० ग्रेड पे ५४००) पदावर या आदेशान्वये पदोन्नती देण्यात येत आहे. पदोन्नती नंतर संबंधितांची नियुक्ती त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदविकाधारक कनिष्ठ अभियंत्याचे नांव, प्रवर्ग (सर्वश्री.) | पदोन्नतीचा प्रवर्ग | वाटप करण्यात आलेला महसुली विभागीय संवर्ग | पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| | | नियमित पदे | | |
| १ | किशोर गोविंदराव अघम ( अ.जा.) | अ.जा. | अमरावती | उप कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग, अचलपूर |
| २ | मारोती राघोबाजी चौखे ( अ.ज.) | अ.ज. | नागपूर | जि.प.(बां) उप विभाग, वडसा |
| | | तदर्थ पदे | | |
| ३ | रमेश नथ्थू कुरकुरे | खुला | नाशिक | जि.प.( इ व द) उप विभाग, येवला |
| ४ | देवराव कठाळू भिसे ( अ.ज.) | अ.ज. | औरंगाबाद | सा.बां.उप विभाग, शिरूर (कासार) |

२. उपरोक्त तक्त्यामधील अ.क्र. ३ व अ.क्र.४ येथे नमूद केलेल्या अभियंत्यांच्या पदोन्नत्या हया निव्वळ तात्पुरत्या स्वरूपाच्या असून, सदर पदोन्नतीच्या अनुषंगाने त्यांना उप विभागीय अधिकारी या संवर्गात जेष्ठता मिळणार नाही. तसेच आवश्यकता भासल्यास अशी तात्पुरती पदोन्नती दिलेल्या अभियंत्यांना पदावनत करण्यात येईल. सदर अट मान्य असल्याबाबत सदर अभियंत्यांकडून पदोन्नतीच्या पदावर रूजू करून घेण्यापूर्वी लेखी स्वरूपात संमती पत्र घेण्यात यावे.

३. उपरोक्त नमूद अभियंत्यांना त्यांच्याविरूध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील नियम ८ व १० खाली विभागीय चौकशी चालू अथवा प्रस्तावित नसल्याच्या अटीच्या अधीन राहून सदर पदोन्नत्या देण्यात येत आहेत. तथापि, यापैकी एखादया अभियंत्याच्या विरूध्द या आदेशाच्या दिनांकास विभागीय चौकशी चालू असल्यास त्यांच्याबाबतीत हे पदोन्नती आदेश आपोआप रद्द होतील.

४. पदोन्नत होणाऱ्या अभियंत्यांपैकी मागास प्रवर्गातील अभियंत्यांनी (मूळ नियुक्ती बिगर मागास प्रवर्गात झालेले अभियंता वगळून ) जात वैधता प्रमाणपत्र शासनास सादर केले आहे या धारणेच्या अधिन राहून सदर पदोन्नत्या देण्यात येत आहेत. तथापि, यापैकी एखादया अभियंत्याने जात वैधता प्रमाणपत्र शासनास सादर केले नसल्यास त्याच्याबाबतीत हे पदोन्नती आदेश आपोआप रद्द होतील.

५. पदोन्नत होणाऱ्या पदविकाधारक कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) यांना शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/कार्या-१२, दि.२८.४.२०१५ व दिनांक १६.७.२०१५ मधील तरतुदीनुसार विभागीय संवर्गाचे वाटप करण्यात आले आहे व पदोन्नतीनंतर त्यांची पदस्थापना केलेले ठिकाण/कार्यालय याबाबतचा तपशील उपरोक्त तक्त्यामध्ये त्यांच्या नावासमोर नमूद करण्यात आलेला आहे.

६. पदविकाधारक कनिष्ठ अभियंता यांना देण्यात आलेली पदोन्नती ही संबंधितांच्या वयाचे ५०/५५ व्या वर्षानंतर पुनर्विलोकन करावयाच्या शासन निर्णयातील तरतूदींच्या अधीन राहील.

७. संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग / अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ यांना अशी विनंती करण्यात येते की, त्यांच्याकडे नियुक्त असलेल्या संबंधित पदविकाधारक कनिष्ठ अभियंता यांना पदोन्नतीचे व सविस्तर नियुक्तीचे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून तात्काळ कार्यमुक्त करावे व नवीन नियुक्तीच्या ठिकाणी कमीतकमी पदग्रहण अवधी घेऊन रजेवर न जाता किंवा कोणत्याही प्रकारे नियुक्ती रद्द करण्याचे अभिवेदन न करता तात्काळ रुजू होण्याचे आदेश द्यावेत.

८. जर वरील अभियंते दिनांक १.४.२०१७ पर्यत पदोन्नतीनंतर देण्यात आलेल्या सविस्तर नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत तर त्यांना पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही असे गृहीत धरुन त्यांच्या पदोन्नतीचे आदेश कसलीही नोटीस न देता रद्द करण्यात येतील. याबाबत नंतर कोणत्याही अभिवेदनाचा विचार केला जाणार नाही यांची संबंधितांनी कृपया नोंद घ्यावी.

९. संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग / मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना कळविण्यात येते की, त्यांच्या प्रादेशिक विभागात नियुक्ती दिलेले पदोन्नत अभियंते दिनांक १.४.२०१७ पर्यत हजर न झाल्यास त्यांची नावे शासनास कळवावीत. जेणेकरुन शासनस्तरावर पुढील कार्यवाही करणे शक्य होईल.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०११११५३३८०६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arvind J Kamble

Digitally signed by Arvind J Kamble
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c7145f142d7f8e597c7957f95eeba7e16ac871e58cfc3b203f7c1273111cfb15, cn=Arvind J Kamble
Date: 2017.03.01 11:54:50 +05'30'

**(अ.ज.कांबळे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई पत्राने.
२. महालेखापाल-१ / २ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
३. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व जिल्हे)
५. अधीक्षक अभियंता व सहसंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक.
६. पदोन्नत होणारे सर्व पदविकाधारक कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) यांना संबंधित मुख्य अभियंता
७. सा.बां.प्रादेशिक विभाग यांचे मार्फत.
८. मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम (उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. मंत्री सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०.मा. राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (उपक्रम वगळून)यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११.मा. राज्यमंत्री सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२.प्रधान सचिव (सा.बां.) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहाय्यक , सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई.
१५.कार्यासन सेवा-१, सेवा-३,आस्थापना- १/३, सेवा-६, संगणक कक्ष, सा.बां.विभाग,मंत्रालय, मुंबई,
१६.कार्यासन सेवा-२ (निवडनस्ती) सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई.